**मुंबई उच्च न्यायालयाच्या, औरंगाबाद खंडपीठातील बी व सी विंग, ॲनेक्स इमारतीतील न्यायालयाकरिता नवीन हार्डवेअर खरेदी करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्र. संप्रिसा-२०२२/प्र.क्र.३४/का. ७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२३.

**संदर्भ:-** १) माहिती तंत्रज्ञान विभाग, शासन निर्णय दिनांक ०१.०८.२०११.
२) मा. प्रबंधक (प्रशासन), मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद, औरंगाबाद यांचे पत्र क्र.N/cash/१५६२/२०२२, दिनांक १०.०२.२०२२.
३) समक्रमांकाचे शासन पत्र दिनांक ३०.०३.२०२२.
४) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.Com./Sec./२१/२०२२, दिनांक ०९.०६.२०२२.
५) समक्रमांकाचे शासन पत्र दिनांक २९.०७.२०२२.
६) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.Com./Sec./३९/२०२२, दिनांक १९.०९.२०२२.
७) समक्रमांकाचे शासन पत्र दिनांक ०६.१०.२०२२.
८) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.Comp./Sec./४७/२०२२, दिनांक १५.१०.२०२२.
९) दिनांक २४.०२.२०२३ रोजीच्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

मुंबई उच्च न्यायालयाच्या, औरंगाबाद खंडपीठ येथील संगणक सन २०१३-१४ व २०१८ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आले होते. तथापि, शासनाच्या दिनांक १ ऑगस्ट, २०११ च्या शासन निर्णयान्वये संगणक साहित्य व इतर हार्डवेअर सामुग्री यांचा कार्यकाल हा पाच वर्षांकरिता निश्चित करण्यात आला आहे. त्यानुषंगाने सन २०१३-१४ व २०१८ या वर्षात वितरीत करण्यात आलेली संगणक सामग्रीचा कार्यकाल संपुष्टात आल्याने त्याऐवजी नवीन हार्डवेअर सामग्री उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्रमांक २ नुसार मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद न्यायालयाकडून प्राप्त झाला होता. तद्नंतर सुधारित प्रस्ताव संदर्भ क्रमांक ६ व ८ अन्वये सादर करण्यात आला. दिनांक २४.०२.२०२३ रोजी झालेल्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीत नवीन हार्डवेअर सामग्री खरेदीकरिता रु.५,९६,९३,३३६/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता देण्यात आली आहे. यानुषंगाने मुंबई उच्च न्यायालयाच्या, औरंगाबाद खंडपीठातील बी व सी विंग, ॲनेक्स

इमारतीतील न्यायालयाकरिता नवीन हार्डवेअर खरेदी करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

मुंबई उच्च न्यायालयाच्या, औरंगाबाद खंडपीठातील बी व सी विंग, ॲनेक्स इमारतीतील न्यायालयाकरिता नवीन हार्डवेअर खरेदी करण्यासाठी रु.५,९६,९३,३३६/- (अक्षरी रु. पाच कोटी शहाण्णव लक्ष त्र्याण्णव हजार तीनशे छत्तीस फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खरेदी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय दिनांक २४.०८.२०१७ व ०८.१२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार विहित पध्दतीने करण्यात यावी.

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधी व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) या लेखाशिर्षाखाली १७ संगणक खर्च" या उदिष्टांतर्गत भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. यानुषंगाने निधीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२९१५५७५३६९१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2023.03.29 16:02:55 +05'30'

**( नि. वि. जिवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
३. मा. प्रबंधक (प्रशासन), मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद, औरंगाबाद
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,

५. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,
६. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.
११. संचालनालय, लेखा व कोषागारे, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड,के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.
१२. कार्यासन अधिकारी १३, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. निवड नस्ती.